महाराष्ट्र पिण्याच्या पाणी पुरवठयाचे अधिग्रहण अधिनियम, १९८३ मधील कलम ८ मध्ये १९९२ मध्ये केलेल्या सुधारणेनुसार पाणी टंचाईच्या कालावधीमध्ये अधिग्रहीत केलेल्या विहिरीच्या मोबदल्याचे सुधारित दर मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.१६७/पापु-१४**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: ३० नोव्हेंबर, २०१८

**वाचा :-**

१) दिनांक १५ एप्रिल, १९८३ चा महाराष्ट्र पिण्याचे पाणी पुरवठयाचे अधिग्रहण अधिनियम १९८३

२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई ३०९९/प्र.क्र. १३/पापु-१४ दिनांक ०१ फेब्रवारी, १९९९
शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१२/प्र.क्र. ५३/पापु-१४, दिनांक ३० एप्रिल, २०१२

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र पिण्याच्या पाणी पुरवठयाचे अधिग्रहण करण्याबाबत अधिनियम १९८३, दिनांक १५ एप्रिल, १९८३ रोजी प्रसिध्द करण्यात आलेला आहे. या अधिनियमातील कलम ३ मधील तरतुदीनुसार पाणी टंचाई कालावधीत राज्यातील ग्रामीण भागातील ग्रामस्थांच्या पिण्याच्या पाण्याची सोय करण्यासाठी विहिरी अथवा अन्य जलाशयातून पिण्याकरिता पाणी उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने खाजगी मालकांचे जलसाठे लेखी आदेशाद्वारे अधिग्रहण करण्याचे अधिकार जिल्हाधिकारी अथवा जिल्हाधिका-यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यास प्रदान करण्यात आलेले आहेत. या अधिनियमातील कलम ८ (अ) व ८(ब) अन्वये खाजगी मालकांचे जलसाठे अधिग्रहीत करण्यात आल्यानंतर त्यांच्या मालकांना दयावयाचा मोबदला निश्चित करण्यात आलेला आहे.

महाराष्ट्र पिण्याच्या पाणी पुरवठयाचे अधिग्रहण अधिनियम, १९८३ मधील कलम-८ मध्ये सुधारणा करण्यात आली असून, सदर सुधारणेनुसार पिण्याच्या पाण्याची विहिर अधिग्रहीत केलेल्या विहिर मालकांना पाण्याचा मोबदला देण्याकरिता १९८३ च्या मूळ अधिनियमातील कलम ८ (अ) व ८(ब) अन्वये मोबदला देण्याची तरतूद अधिक्रमित करण्यात आली असून त्याऐवजी खाजगी मालक व

प्राधिकृत अधिकारी यांनी मोबदल्यासंदर्भात करार करण्याची तरतूद करण्यात आली असून मोबदल्याच्या दराची कमाल मर्यादा राज्य शासनाने वेळोवेळी ठरवावयाची आहे.

सद्य:स्थितीत संदर्भ क्रमांक-३ येथील दिनांक ३० एप्रिल, २०१२ च्या शासन निर्णयानुसार खाजगी विहिर अधिग्रहीत केल्यानंतर त्या विहिर मालाकाने पाणी काढण्यासाठी विद्युत / डिझेल पंप व विद्युत कनेक्शनसह साधन सामुग्री उपलब्ध करुन दिली नसल्यास प्रतिदिन रु. ३००/- या कमाल मर्यादेत व विहिर मालकाने पाणी काढण्यासाठी विद्युतपंप /डिझेलपंप व विद्युत कनेक्शनसह साधन सामुग्री उपलब्ध करुन दिली असल्यास प्रतिदिन रु. ४००/- कमालमर्यादेत अधिग्रहण मोबदला दिला जात आहे. दरम्यानच्या कालावधीत सर्वस्तरावर बरीच भाववाढ झालेली असल्याने, विहिर अधिग्रहणाच्या मोबदल्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र पिण्याचे पाणी पुरवठयाचे अधिग्रहण अधिनियम १९८३ च्या अधिनियमातील कलम ८ मध्ये दिनांक २४ एप्रिल, १९९२ च्या Maharashtra Act No. V of १९९२ अन्वये केलेल्या सुधारणेनुसार अधिग्रहण मोबदल्याच्या दराची कमाल मर्यादा ठरविण्याबाबत राज्य शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करुन सन **२०१२** मध्ये निश्चित केलेल्या विहिर अधिग्रहणाची मोबदल्याची कमाल मर्यादा पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे.

"खाजगी विहिर अधिग्रहीत केल्यानंतर त्या विहिर मालकाने पाणी काढण्यासाठी विद्युत/डिझेल पंप व विद्युत कनेक्शनसह साधन सामुग्री उपलब्ध करुन दिली नसल्यास रु. ४५०/- या कमाल मर्यादेत व विहिर मालकाने पाणी काढण्यासाठी विद्युतपंप/ डिझेलपंप व विद्युत कनेक्शनसह साधन सामुग्री उपलब्ध करुन दिली असल्यास प्रतिदिन रु. ६००/- कमालमर्यादत विहिर अधिग्रहण मोबदला देण्यात यावा".

२. वरीलप्रमाणे निश्चित करण्यात आलेल्या मोबदल्यासंदर्भात विहिर मालकाशी कायदेशीर करार करण्यात यावा.

३. विहिर अधिग्रहीत करताना १९८३ च्या अधिनियमातील इतर तरतूदींचाही काटेकोरपणे वापर करावा व अधिग्रहण मोबदल्याची रक्कम दर तीन महिन्यांनी वेळच्या वेळी संबंधितांना अदा करावी. सदर अनुज्ञेय असलेल्या मोबदल्याची मागणी ग्रामपंचायत / गट विकास अधिकारी यांच्यामार्फत येण्याची प्रतिक्षा न करता तपासणी करुन संबंधितांना प्रदान करण्यात येतील याची कृपया दक्षता घ्यावी.

४. पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपरोक्त विहिर अधिग्रहण मोबदल्याचा खर्च नैसर्गिक आपत्ती निवारण सहाय्य लेखाशिर्ष २२४५ ००९३ अंतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून भागविण्यात यावा

५. वरील आदेश हा शासन निर्णय निर्गमीत झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

६. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३०७/२०१८/व्यय-३, दिनांक १.११.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११३०१०५४४८८८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Pandurang Rawaji Khotare

Digitally signed by Pandurang Rawaji Khotare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f71ac87a049de582c5d577413de65742dfc38429fe3ee979d9ff3651730674c, serialNumber=241eb93ab449def8114b5fbff2ea51ab0f16e0092f0102aa9502d0457228dd65, cn=Pandurang Rawaji Khotare
Date: 2018.11.30 12:17:32 +05'30'

**( पां.रा. खोटरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे खाजगी सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई,
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य, विधानभवन, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव, (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
९. सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
११.विभागीय आयुक्त ( सर्व ),
१२.जिल्हाधिकारी, (सर्व),
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद, (सर्व ),
१४.अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व ),
१५.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, (सर्व ),
१६. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व ),
१७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा ( सर्व ),
१८. जिल्हा स्थानिक निधी लेखा परिक्षक (सर्व ),
१९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व ),
२०. महालेखापाल, महाराष्ट्र-१,मुंबई (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता),
२१.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता),
२२.भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेचे सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक,

२३.सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी,
२४.सर्व तहसिलदार,
२५.अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
२६.उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
२७.निवड नस्ती, पापु-१४.